तातडीचे

शून्याधारित अर्थसंकल्प योजनेमुळे अतिरिक्त ठरलेल्या कर्मचाऱ्यांबाबत माहिती.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक:एससीसी-१०८७/६७/सीआर-४/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३ मे १९८८.

वाचा:- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एससीसी-१०८७/६७/सीआर-४/१६-अ, दिनांक १० मार्च १९८७.

२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एससीसी-१०८७/६७/सीआर-४/१६-अ, दिनांक ८-५-८७.

परिपत्रक

शून्याधारित अर्थसंकल्प योजनेमुळे अतिरिक्त ठरणाऱ्या कर्मचाऱ्यांपैकी विहित अटी पूर्ण करणाऱ्या कर्मचाऱ्यांना शासन सेवेत सामावून घेण्यासाठी अतिरिक्त संवर्ग कक्ष सामान्य प्रशासन विभागात निर्माण करण्यात आला आहे. या कक्षातर्फे अतिरिक्त संवर्गात समाविष्ट करण्यासाठी मंत्रालयीन विभागाकडून संबंधीत कर्मचाऱ्यांची यादी विहित नमुन्यात आलेल्या माहितीद्वारे तयार करण्यात येते. परंतु असे दिसून येते की मंत्रालयीन विभाग अतिरीक्त ठरणाऱ्या सर्वच कर्मचाऱ्यांची माहिती सामान्य प्रशासन विभागाकडे नियमितपणे पाठवित नाहीत. अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या सर्व कर्मचाऱ्यांबाबत शासनाला अद्यावत माहितीची वेळोवेळी आवश्यकता असल्याने सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग/कार्यालयातून दिनांक ३१.३.८८ पर्यंत अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या सर्व कर्मचाऱ्यांची पुढील मुद्यावर माहिती कृपया एकत्रित करून ह्या विभागाकडे दिनांक १५ मे १९८८ पूर्वी पाठविण्याची व्यवस्था करावी. तसेच एप्रिल १९८८ पासून अतिरिक्त ठरविलेल्या सर्व कर्मचाऱ्यांची अशीच मासिक माहिती ह्या विभागाकडे पुढील महिन्याच्या १० तारखेपूर्वी पाठविण्याची कृपया व्यवस्था करावी.

१] कार्यालयाचे नांव व पत्ता

२] अतिरिक्त ठरलेल्या कर्मचाऱ्याचे संपूर्ण नाव, हुद्दा, वेतन श्रेणी वगैरे

[कृ. मा. प.. ]

३] नियमित स्वरुपात मूळ नेमणूकीचा दिनांक

४] अतिरिक्त ठरल्याचा दिनांक

५] अतिरिक्त संवर्गात दाखल केले वा अन्य कोणती कार्यवाही केली त्या बाबत अभिप्राय

६] अतिरिक्त कर्मचाऱ्यास विभागांतील रिक्त पदांवर [जी पदे ६ महिन्यांचे वर रिक्त आहेत] सामावून घेतले असल्यास

७] अभिप्राय

वरील प्रमाणे मागविण्यात आलेली माहिती ही संदर्भाधीन दिनांक १० मार्च १९८७ च्या परिपत्रकांनुसार पाठवावयाच्या माहिती व्यतिरिक्त आहे हे स्पष्ट करण्यात येत आहे.

अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या/येणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांची माहिती सामान्य प्रशासन विभागाकडे न चुकता दर महिन्यास वरील प्रमाणे पाठविण्याची जबाबदारी मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या एखाद्या उप सचिव/अवर सचिवांकडे सोपविण्याबाबत विचार करावा म्हणजे सामान्य प्रशासन विभागास अशा अधिकाऱ्याशी वेळोवेळी संपर्क साधता येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व मंत्रालयीन विभाग.